**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वैयक्तिक लाभार्थ्यांच्या सलग शेतावर, शेताच्या बांधावर व पडीक जमिनीवर अमृत महोत्सवी फळझाड / वृक्ष लागवड व फूलपिक लागवड कार्यक्रम राबविण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग (रोहयो प्रभाग)**
**शासन निर्णय क्र. फळबाग- २०२१/प्र.क्र.६३/मग्रारो - ५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० मार्च, २०२२

वाचा-

१. शासन निर्णय क्र. मग्रारो २०११/ प्र. क्र.१३२/रोहयो-१० अ दि. २० जानेवारी २०१२
२. शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१६/ प्र.क्र. ६१/ मग्रारो-१ दिनांक १२ एप्रिल, २०१८

प्रस्तावना-

भारत देश आपल्या स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवी वर्ष साजरा करीत आहे. आपल्या देशासाठी ही अभिमानाची बाब आहे. अशात महाराष्ट्र राज्याने राज्यातील दारिद्र्याच्या उच्चाटनासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत मोठ्या प्रमाणावर वैयक्तिक लाभार्थ्यांच्या सलग शेतावर, शेताच्या बांधावर व पडीक जमिनीवर अमृत महोत्सवी फळझाड/ वृक्ष व फूलपिक लागवड कार्यक्रम ठरवलेला आहे. उद्दिष्ट असा आहे की पुढील २५ वर्षे दरवर्षी सरासरी एक लक्ष हेक्टर फळझाड/ वृक्ष/ फूलपिक लागवड होईल जेणेकरुन स्वातंत्र्याचे १०० वर्षे पूर्ण होतील तेव्हा या योजनेअंतर्गत एकूण २५ लक्ष हेक्टर लागवड झाली असेल. तसेच या आणि अन्य माध्यमातून देशाच्या शताब्दी वर्षी राज्याला अधिकाधिक शेतकऱ्यांना लक्षाधिश करण्यात यश आलेला असेल.

सन १९९० -९१ मध्ये राज्यात प्रथमत: रोजगार हमी योजनेद्वारे फळबाग लागवड योजना राबविण्यात आली. सदर योजनेमुळे राज्यात फळबाग पिकाखाली क्षेत्र वाढण्यास मदत झाली व योजनेस शेतकऱ्यांचा चांगला प्रतिसाद मिळाला. फळपिकाचे उत्पादन वाढीसाठी सूक्ष्म सिंचनाचा वापर तसेच व्यावसायिक पद्धतीने फळबागांचे नियोजन केल्यामुळे उत्पादनात वाढ होऊन निर्यातीस चालना मिळण्यास मदत झाली. त्यामुळे आजच्या घटकेला महाराष्ट्र राज्य फलोत्पादन पिकाचे उत्पादन व निर्यातीमध्ये अग्रेसर आहे.

शेतकऱ्यांचा विविध नविन फळ / फुलपिकांची सलग जमिनीमध्ये तसेच बांधावर व पडीक जमिनीमध्ये लागवड करण्याकडे कल वाढत आहे. इतर राज्ये ही नवनवीन फळपिकांचा महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेमध्ये समावेश करून शेतकऱ्यांना फळबाग लागवड करण्यासाठी मदत करीत आहेत. सदर वस्तुस्थिती लक्षात घेऊन राज्यात फळबाग योजनेला प्रोत्साहन देण्यासाठी तसेच शेतकऱ्यांच्या मागणीचा विचार करून तसेच भविष्यात फलोत्पादन पिकास असलेला वाव लक्षात घेऊन नवीन फळपिके व फुलपिके यांचा महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेत समावेश करण्यात येत आहे. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वैयक्तिक लाभार्थ्यांच्या शेताच्या बांधावर व शेतक-यांच्या शेतजमीनीवर वन विभागाच्या सामाजिक वनीवरण शाखेमार्फत वृक्ष लागवड कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

सदर कार्यक्रम संबंधित विभागामार्फत राबविताना एकसुत्रिपणा येण्यासाठी संदर्भाधिन शासन निर्णय अधिक्रमीत करुन सर्व समावेशक शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम, १९७७ (दिनांक ६ ऑगस्ट, २०१४ पर्यंत सुधारित) मधील अनुसूची दोन मधील परिछेद ४ नमुद करण्यात आल्याप्रमाणे खालील प्रवर्गातील प्राधान्य क्रमानुसार वैयक्तिक लाभार्थ्यांच्या सलग शेतावर, शेताच्या बांधावर व पडीक जमिनीवर फळझाड व फूलपिक लागवड कार्यक्रम ग्राम पंचायती तसेच कृषी व फलोत्पादन विभागामार्फत आणि वृक्ष लागवड कार्यक्रम वन विभागाच्या सामाजिक वनीकरण शाखेमार्फत हाती घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) अनुसूचित जाती (Schedule Caste)
ब) अनुसुचितजमाती (Schedule Tribes)
क) भटक्या जमाती (Nomadic Tribes)
ड) निरधिसूचित जमाती (विमुक्त जमाती De-notified Tribes)
इ) दारिद्र रेषेखालील इतर कुटुंबे (Families below the poverty line)
फ) स्त्री कुटुंब प्रमुख असलेली कुटुंबे (Women-headed households)
ग) दिव्यांग व्यक्ती कुटुंब प्रमुख असलेली कुटुंबे (physically handicapped headed Households)
ह) जमीन सुधारणांचे लाभार्थी (benificiaries of land reforms)
ई) प्रधानमंत्री आवास योजना - ग्रामीण योजनेखालील लाभार्थी,
ज) "अनुसुचित जमातीचे व इतर पारंपरिक वनवासी (वन हक्के मान्य करणे) अधिनियम, २००६ (२००७ चा २) खालील पात्र लाभार्थी (benificiaries under Schedule Tribes and other Traditionl Forest Dwellers)

उपरोक्त प्रवर्गामधील (अ) ते (ज) पात्र लाभार्थींना प्राधान्य देण्यात आल्यानंतर, कृषि कर्ज माफी योजना, २००८ या मध्ये व्याख्या केलेल्या अल्प भूधारक [१ हेक्टरपेक्षा जास्त पण २ हेक्टर (५ एकर) पर्यंत जमीन असलेले शेतकरी (जमीन मालक किंवा कूळ)] व सीमांत भूधारक शेतकरी [१ हेक्टर पर्यंत जमीन असलेला शेतकरी (जमीन मालक किंवा कूळ)] यांच्या जमीनीवरील कामांना शर्तीच्या अधीनतेने प्राधान्य देण्यात यावे.

मग्रारोहयोसाठी जॉबकार्ड धारक वरील “अ” ते “ज” प्रवर्गातील कोणतीही व्यक्ती वैयक्तीक लाभार्थी म्हणून या योजनेचा लाभ घेण्यास पात्र आहे.

२. **क्षेत्र मर्यादा**

या योजनेअंतर्गत फळझाड/ वृक्ष / फूलपिक लागवडीसाठी कमीत कमी ०.०५ हेक्टर व जास्तीत जास्त २.० हेक्टर प्रति लाभार्थी क्षेत्र मर्यादा राहील.
इच्छुक लाभधारकांच्या नावे जमीन असणे आवश्यक आहे. ही जमीन कूळ कायद्याखाली येत असल्यास व ७/१२ च्या उताऱ्यावर कूळाचे नाव असेल तर योजना राबवीत असताना कूळाची संमती घेण्यात यावी.

**मार्गदर्शक सूचना ---**

**३. लाभधारक निवड पध्दती**

३.१ या योजनेअंतर्गत लाभ घेण्याकरिता गावात दवंडी देऊन/ गावात उपलब्ध असलेले सर्व व्हाट्सएप ग्रुपमध्ये माहिती देऊन सर्व इच्छुक व्यक्ती पर्यंत माहिती पोहोचवायची आहे. अर्ज करण्याकरिता ग्रामपंचायतीच्या प्रत्येक महसूली गावात २४ तास अर्ज टाकता येईल अशा ठिकाणी 'अर्ज पेटी' ठेवावयाची आहे. शक्य तेवढे असे "अर्ज पेटी" सार्वजनिक इमारत जसे अंगणवाडी, शाळा, ग्रामपंचायत, समाज मंदिर येथे लावण्यात यावी. शिवाय ऑनलाईन अर्ज करण्याची व्यवस्था सुद्धा करण्यात यावी.

३.२ इच्छुक लाभार्थ्याने विहीत नमुन्यातील अर्ज (प्रपत्र अ- अर्जाचा नमूना व ब- संमती पत्र सोबत जोडले) ऑनलाईन किंवा "अर्ज पेटीत" टाकावे. त्यात फळबाग/ फूलपिकाचे कार्य ग्रामपंचायत किंवा फलोत्पादन (कृषी) विभाग यापैकी कोणाकडून राबविण्यात रस आहे याचा स्पष्ट उल्लेख लाभार्थ्यास करावा लागेल. ऑनलाईन व्यवस्था तयार झाल्यावर लाभार्थ्याने शक्य तोवर ऑनलाईन अर्ज करावा.

३.३ "पत्र पेटी" दर सोमवारी उघडण्यात येऊन त्यातील अर्ज ऑनलाईन भरण्याचे कार्य ग्रामपंचायतीचे असेल. हे कार्य ग्रामपंचायत स्वतःचे डाटा एंट्री ऑपरेटर किंवा ग्राम रोजगार सेवक यांच्या मदतीने करेल. याप्रमाणे मग्रारोहयोच्या सर्व मागण्या ऑनलाईन भरले जातील ही जबाबदारी त्या ग्रामपंचायतीसाठी

जबाबदार असलेले तांत्रिक सहाय्यकाची राहील. वेळ प्रसंगी तांत्रिक सहाय्यकास सुद्धा ऑनलाईनसाठी डाटा एंट्री करावी लागली तरी त्यांनी ती करावी.

३.४ वरील प्रमाणे प्राप्त झालेले सर्व अर्ज ग्रामपंचायतीस/ ग्रामसेवकास ऑनलाईन पद्धतीने उपलब्ध करून दिले जातील. या सर्व अर्जांना ग्रामसभेची मंजूरी प्राप्त करून देण्याची जबाबदारी ग्रामसेवकाची राहील.

३.५ **ग्रामपंचायत/ ग्रामसभा मंजुरी :-**

मग्रारोहयोच्या कार्यपध्दती प्रमाणे कोणाला व किती लाभ घेता येईल याबाबत निर्णय ग्रामसभेत घेणे आवश्यक आहे. तथापि, ०५ ऑगस्ट, २०२० तसेच ०२ सप्टेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णया प्रमाणे ग्रामपंचायतीच्या मान्यतेने लाभार्थ्यांची निवड करता येते. योग्य प्रचार व प्रसिद्धी केल्यानंतर प्राप्त झालेल्या सर्व पात्र लाभार्थ्यांच्या यादीस त्यापुढील होणाऱ्या ग्रामसभेत अवलोकनार्थ ठेवण्यात यावे.

३.६ **लेबर बजेट :-**

१५ जुलै ते ३० नोव्हेंबर याकालावधी मध्ये आलेले सर्व अर्ज मंजूर करून त्या वर्षाचे लेबर बजेटमध्ये समाविष्ठ करावे.

३.७ **पूरक लेबर बजेट :-**

तसेच ज्या लाभार्थ्यांची नावे लेबर बजेटमध्ये समाविष्ट झाली नाही व सदर लाभार्थी योजनेचा लाभ घेण्यास इच्छुक आहेत, अशा लाभार्थींना योजनेचा लाभ मिळण्याकरिता पूरक लेबर बजेट तयार करावे. त्याकरिता दिनांक १ डिसेंबर ते पुढील वर्षाचे १४ जुलै पर्यंत "अर्ज पेटीत" किंवा ऑनलाईन प्राप्त अर्जांना त्या त्या महिन्यांचे पंचायत सभेत मान्यता देऊन पंचायत समितीस मान्यतेसाठी पाठवावी. तसेच त्यापुढील होणाऱ्या ग्रामसभेत सदर यादीस अवलोकनार्थ प्रस्तुत करण्यात यावे.

३.८ ग्रामपंचायतीची मान्यता प्राप्त झाल्यावर सदर कामास तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात येऊन फळबाग/ वृक्ष व फूलपिक लागवड सुरू करावेत. हे कार्य शेतकऱ्यांनी दिलेल्या पसंतीनुसार पंचायत विभाग/ कृषी व फलोत्पादन विभाग तसेच वृक्ष लागवड समाजिक वनीकरण विभागामार्फत करण्यात यावे.

३.९ महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायद्याच्या तरतुदीनुसार जिल्हा परिषदेने शेल्फवर कामे मंजूर करावयाचे आहेत. वरीलप्रमाणे प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्राप्त कामांना जिल्हा स्तरीय समितीच्या माध्यमातून शेल्फवर घेण्यात यावे. तथापि, यासाठी कार्योत्तर मंजूरी घेण्याचे प्रावधान ठेवण्यात येत आहे.

## ४. समाविष्ट फळपिके / वृक्ष व फूलपिके

योजने अंतर्गत समाविष्ट खालील फळपिके / वृक्ष व फूलपिकांची लागवड करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) आंबा २) काजू ३) चिकू ४) पेरु ५) डांळिब ६) संत्रा ७) मोसंबी ८) कागदी लिंबू ९) नारळ १०) बोर ११) सिताफळ १२) आवळा १३) चिंच (विकसीत जाती) १४) कवठ १५) जांभुळ १६) कोकम १७) फणस १८) अंजीर १९) सुपारी २०) बांबू २१) साग २२) जड्रोफा २३) गिरीपुष्प २४) कडीपत्ता २५) कडूलिंब २६) सिंधी २७) शेवगा २८) हदगा २९) पानपिंपरी ३०) केळी (३ वर्ष) ३१) ड्रॅगनफ्रुट ३२) ॲव्हाकॅडो ३३) द्राक्ष ३४) चंदन ३५) खाया ३६) निम ३७) चारोली ३८) महोगनी ३९) बाभूळ ४०) अंजन ४१) खैर ४२) ताड ४३) सुरु ४४) रबर ४५) महारुख ४६) मँजियम ४७) मेलिया डुबिया ४८ ) तुती (मलबेरी) ४९) ऐन ५०) शिसव ५१) निलगिरी ५२) सुबाभुळ ५३) शेमी ५४) महुआ ५५) गुलमोहर ५६) बकान निब ५७) चिनार ५८) शिरीष ५९) करवंद

**फुलझाड** - १) गुलाब २) मोगरा ३) निशीगंध ४) सोनचाफा

**औषधी वनस्पती** - १) अर्जुन, २) असान, ३) अशोका, ४) बेहडा, ५) हिरडा, ६) बेल, ७) टेटु, ८) डिकेमाली, ९) रक्तचंदन, १०) रिठा, ११) लोध्रा, १२) आइन, १३) शिवन, १४) गुग्गुळ, १५) बिब्बा १६) करंज

**मसाल्याची पिके** - १) लवंग, २) दालचिनी, ३) मिरी ४) जायफळ

**उपरोक्त प्रमाणे समाविष्ट फळपिक व फुलपिकांबाबत योग्य ती कार्यवाही करण्याची जबाबदारी ग्राम पंचायती तसेच कृषी व फलोत्पादन विभागाची राहील तसेच वृक्ष लागवड कार्यक्रमाबाबत समाविष्ट वृक्षांबाबत योग्य ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सामाजिक वनीकरण विभागाची राहील.**

मग्रारोहयो अंतर्गत फळ / फुलझाड / वृक्ष लागवड करताना लाभार्थीस खालील नमुद १, २, ३ प्रमाणे लाभ घेत असलेल्या जागेमधील माती परिक्षण अहवालानुसार विहित निकषानुसार योग्य असणा-या फळझाड / फुलझाड / वृक्ष लागवडीचा लाभ घेण्याची मुभा राहील.

१) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतंर्गत वैयक्तिक लाभार्थ्यांच्या सलग शेतावर फळझाड / वृक्ष व फूलपिकांची लागवड
२) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतंर्गत वैयक्तिक लाभार्थ्यांच्या शेताच्या बांधावर फळझाड / वृक्ष लागवड
३) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतंर्गत वैयक्तिक लाभार्थ्यांच्या पडीक शेतावर फळझाड / वृक्ष लागवड

**५. अन्य विभागांशी सांगड :-**

या योजनेच्या लाभार्थ्यांना अन्य विभागाच्या योजनेशी सांगड घालून त्या योजनांचा लाभ घेता येईल. फळबाग लागवड केल्यानंतर अन्य योजना जसे ठिबक सिंचन किंवा विहिरी यांचा लाभ घेता येईल. (मग्रारोहयोच्या विहिरींचाही लाभ घेता येईल.)

**६. फळझाड / वृक्ष लागवडीसाठी मुदत :-**

मग्रारोहयो अंतर्गत फळझाड व फुलझाड लागवड योजना योग्यरितीने राबविण्यासाठी पंचायती तसेच कृषी व फलोत्पादन विभागाने कालबध्द कार्यक्रम तयार करून अंमलबजावणी करावी. तसेच वन विभागाच्या सामाजिक वनीकरण शाखेमार्फत वृक्ष लागवड योजना योग्य रीतीने राबविण्यासाठी कालबध्द कार्यक्रम तयार करुन अंमलबजावणी करावी.

पावसाळ्याचा विचार केल्यास फळ / फुलझाड / वृक्ष लागवडीचा कालावधी दिनांक १ जून ते ३१ डिसेंबर पर्यंत योग्य असते. जमीनीतील आर्द्रता योग्य असल्यास या कालावधीत वाढ करण्याचे अधिकार जिल्हा स्तरीय समितीस राहील. तथापि सिंचनाची व्यवस्था असल्यास वर्ष भरात केव्हाही लागवड करता येईल. त्यासाठी इतर प्राधिका-याच्या मंजूरीची आवश्यकता असणार नाही.

**७. आर्थिक मर्यादा :-**

प्रत्येक लाभार्थ्यास २.० हेक्टर पर्यंत फळबाग/ वृक्ष लागवड / फुलपिक लागवड अनुज्ञेय आहे. त्यामुळे विविध फळझाडे आणि फुलपिकसाठी **शासन मान्यतेने** वेळोवेळी जे आर्थिक मापदंड निश्चित करतील त्या आधारावर २.० हेक्टर साठी एखाद्या फळबाग, वृक्ष किंवा फुलपिकसाठी लागणारी प्रत्यक्ष अंदाजपत्रकीय मंजूर रक्कम ही आर्थिक मर्यादा राहील. तथापि, फळबागाचे वैयक्तिक लाभ कोणत्याही एका जॉबकार्ड वर एका वर्षात १०० दिवसांपर्यंत मंजूरी देण्यात यावी. १०० दिवसांपेक्षा अधिक काम करण्याची गरज असणाऱ्या कुटुंबांना त्यांच्या स्वतःच्या वैयक्तिक कामाव्यतिरिक्त सार्वजनिक कामांवर काम द्यावे. त्यासाठी सर्व ग्राम रोजगार सेवक/ ग्रामसेवक/ कृषी सहाय्यक यांनी लाभार्थ्यांचे गट तयार करून नियोजन बद्ध पद्धतीने कार्य करणे आवश्यक आहे. म्हणजेच वैयक्तिक कामात एका जॉबकार्ड धारकास एका वर्षात १०० दिवसांपेक्षा अधिक लाभ देण्यासाठी अधिक जॉबकार्ड धारकांची मदत घ्यावी.

असे केल्याने केंद्र शासनाच्या निधीचा अधिकाधिक लाभ घेता येईल. त्याने राज्यातील अधिकाधिक कुटुंबांना कमीत कमी वेळेत लाभ देणे शक्य होईल.

**८. फळबाग / वृक्ष / फूलपिक लागवडीसाठी तांत्रिक मार्गदर्शन व सनियंत्रण :-**

फळबाग, वृक्ष लागवड व फूलपिक लागवड योजना यशस्वी करण्यासाठी सर्व प्रकारचे मार्गदर्शन व तांत्रिक सहाय्य करण्याची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र | विभाग | राज्यस्तरावर | विभागस्तर | जिल्हा स्तरावर | तालुका स्तरावर |
|---|---|---|---|---|---|
| १ | कृषी विभाग ग्रामपंचायत व पंचायत समिती | संचालक, फलोत्पादन | सहसंचालक, फलोत्पादन | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / कृषी विकास अधिकारी जिल्हा परिषद, | तालुका कृषि अधिकारी, मंडळ कृषी अधिकारी, पंचायत समिती कृषी अधिकारी, |
| २ | सामाजीक वनीकरण | प्रधान मुख्य वन संरक्षक, | वनसंरक्षक सामाजिक वनीकरण | विभागीय वन अधिकारी | वनक्षेत्रपाल |

ग्रामपातळीवरील ग्रामसेवक, कृषि सहाय्यक, ग्राम रोजगार सेवकांना तसेच वनरक्षक हे प्रकल्पात सर्व प्रकारचे तांत्रीक मार्गदर्शन करावयाचे आहे.

८.१ शेतजमिनीच्या प्रतवारीनुसार सुयोग्य वृक्ष/ फळझाडांची व फूलपिकांची निवड करणे.

८.२ लिंबू वर्गीय फळपिकांसाठी चूनखडी प्रमाण योग्य असणे आवश्यक असल्याने मातीचे परिक्षण करण्यात यावे. बाकीच्या पिकांसाठी माती परिक्षण आवश्यक असणार नाही.

८.३ फळबाग /वृक्ष व फूलपिकांची लागवडीनंतर आवश्यक ते सर्वप्रकारचे तांत्रीक मार्गदर्शन करणे.

**९. तांत्रिक व प्रशासकीय मंजुरी :-**

१) तांत्रिक मंजुरीचे अधिकार, प्रशासकीय मंजुरीचे अधिकार तसेच वैयक्तिक लाभार्थ्याच्या शेतावर राबविण्यात येणाऱ्या फळबाग लागवड, फुलपिक लागवड, सामाजीक वनीकरणामार्फत वृक्ष लागवड कार्यक्रम, नाडेप कंपोस्टींग, व्हर्मीकंपोस्टींग, शेततळे व शासकीय रोपवाटींकेच्या कामाबाबतचे हजेरीपत्रक निर्गमित करणे, भरणे, पारीत करणे आणि कुशल /अकुशल बाबींचे देयके प्रदान करण्याचे अधिकार याआधी सारखेच राहील.

२) खर्चाच्या मापदंडाप्रमाणे प्रत्यक्षात लागवड करावयाच्या झाडांची संख्या विचारात घेऊन खर्चाचे अंदाजपत्रक सेक्योर /ॲपद्वारे तयार करावे. तसेच त्यास तांत्रिक व प्रशासकिय मंजुरी देण्यात यावी. या दोन्ही मान्यतेनंतरच लागवड करावी. प्रत्येक लाभार्थीच्या जमिनीवरील फळबाग/ वृक्ष व फूलपिक लागवड हा स्वतंत्र प्रकल्प समजण्यात येईल. अशा प्रत्येक प्रकल्पासाठी प्रशासकिय व तांत्रीक मान्यता स्वतंत्रपणे देण्यात येईल. तसेच या प्रत्येक प्रकल्पाला MIS वर नोंद घेण्यासाठी स्वतंत्र संगणक क्रमांक असेल.

३) वैयक्तिक लाभ २.० हेक्टर पर्यंत द्यावयाचे असल्यामुळे त्यासाठी विविध फळझाड आणि फूलपिकासाठी वेळोवेळी लागू करण्यात आलेले आर्थिक मर्यादेत वरील प्रमाणे प्राधिका-यास तांत्रिक तथा प्रशासकिय मान्यता देण्याचे अधिकार राहतील.

**१०. निरीक्षण नोंदवही :-**

अ) लागवड केलेल्या फळबाग लागवडीची नोंद मोजमापन पुस्तिका मध्ये घ्यावी.

ब) मग्रारोहयो अंतर्गत होणाऱ्या कामाच्या मोजमापासाठी एक काम - दोन मोजमापन पुस्तिका संकल्पना वापरण्यास अनुमती आहे.

क) गाव पातळीवर झालेल्या फळबाग लागवडीची माहिती कृषि सहाय्यकांनी ग्रामपंचायतीस देणे आवश्यक राहील व त्या आधारे ग्रामपंचायतीकडील नरेगाच्या मालमत्ता रजिस्टरमध्ये ग्रामपंचायतीने नोंद घ्यावी.

ड) फळबाग /फुलपिक लागवड झाल्यानंतर ई -पिक पहाणी करुन ७/१२ वर त्याची नोंद घेण्यात यावी.

**११. मापदंड व अंदाज पत्रके तयार करणे:**

१) लाभार्थीला किती क्षेत्रावर, कोणत्या फळझाडांची/ फुलपिकांची लागवड तसेच कोणत्या प्रकारात लागवड करावयाची आहे त्याप्रमाणे शासन मान्यतेने मंजूर केलेल्या मापदंडानुसार स्वतंत्रपणे अंदाजपत्रके तयार करणे आवश्यक आहे. फळपिकनिहाय / फुलपिकनिहाय मंजूर केलेल्या मापदंडावर आधारित सविस्तर अंदाजपत्रके तयार करावीत. कामाचे अंदाजपत्रक वस्तूनिष्ठ करण्यात यावीत ज्यामुळे कामाचे मुल्यांकन करताना फार मोठी तफावत येणार नाही.

२) प्रत्येक आर्थिक वर्षाच्या १ एप्रिल रोजी केंद्र शासनाकडून मजुरी दर सुधारित करण्यात येतो, सुधारित मजूरी दरानुसार योजनेतील फळपिके/ वृक्ष/ फुलपिकांच्या मापदंडामध्ये सुधारणा करुन अंदाजपत्रकामध्ये मजूरी बदलामुळे मापदंडामध्ये झालेल्या वाढीस व बदलास प्रत्येक वेळी शासन मान्यतेने मंजूरी देण्यात येईल. वेळोवेळी कलमे / रोपे / सामुग्री दरांमध्ये वाढ व बदल झाल्यास त्यानुसार सुधारित मापदंडास शासनाच्या मान्यतेने सुधारित मापदंड निश्चित होईपर्यंत पुर्वीच्या मापदंडाप्रमाणे योजनेची अमंलबजावणी करावी.

**सामाजीक वनीकरण मार्फत वृक्ष लागवडीसंदर्भात वेळोवेळी शासनाने विहित केलेल्या आर्थिक मापदंडानुसार कार्यवाही करावी.**

**१२. प्रशिक्षण :-**

मनरेगा अंतर्गत निवड केलेल्या लाभार्थ्यांना वेळोवेळी वृक्ष/फळझाड/ फूलपिकांची लागवडीसाठी त्यांनी करावयाची कामे, अनुदान व लागवडीनंतर फळबागेचे सवंर्धन याशिवाय इतर तांत्रिक बाबी म्हणजे खड्डे खोदणे, शास्त्रोक्त पध्दतीने खड्डे भरणे, पिकसंरक्षण, खते देणे, पाणी देणे, काढणी पश्चात तंत्रज्ञान व मार्केटींग याबाबत प्रशिक्षण आयोजित करुन माहिती देण्यात यावी. यासाठी लागणारा खर्च इतर संकीर्ण या बाबीवरील अनुदानातुन भागवावा. प्रत्येक प्रशिक्षण वर्गात किमान ५० शेतकरी असावेत. त्यासाठी नजिकच्या गावातील शेतकऱ्यांना एका ठिकाणी/गावी प्रशिक्षण देण्यात यावे. तसेच ग्रामरोजगारसेवक, तांत्रिक सहाय्यक, सहाय्यक कार्यक्रम अधिकारी यांचे प्रशिक्षण तालुका / जिल्हा स्तरावर आयोजित करावे. सध्या कोविड मुळे प्रत्यक्ष प्रशिक्षणास मर्यादा येत आहेत. या परिस्थितीत ऑनलाईन प्रशिक्षण आयोजित करण्यात यावे. प्रत्यक्ष प्रशिक्षण देण्याच्या परिस्थितीत सुद्धा प्रशिक्षणापूर्वी व नंतर यूट्युबमध्ये उपलब्ध असलेल्या व्हिडिओ चे पुरेपूर वापर करण्यात यावे.

**१३ कलमा / रोपांचा पुरवठा:**

प्रत्येक आर्थिक वर्षात मनरेगा अंतर्गत लागवड करावयाच्या कलमे /रोपांची उचल करण्यापूर्वी, गुणवत्तापुर्ण रोगमुक्त कलमे /रोपांची निर्मीती, उपलब्धता व पुरवठयाबाबत जिल्हास्तरीय समितीने तपासणी करुन लागवडीपूर्वी रोगमुक्त व दर्जेदार कलमे/रोपे शेतकऱ्यांना उपलब्ध होतील याची दक्षता घ्यावी.

मनरेगा अंतर्गत लागवड करावयाच्या कलमे / रोपांची निवड व खरेदी लाभार्थीने स्वत: करावी. कलमे/ रोपांच्या दर्जाबाबतची जबाबदारी लाभार्थ्याची राहील. कोणत्या प्रकारच्या फळझाडांची / फुलपिकांची लागवड करावयाची याबाबत वृक्ष निवडीबाबत लाभार्थीची इच्छा व तयारी या निकषांचे पालन करावे. जमिनीची प्रत जर लिंबूवर्ग वृक्ष लागवड करायची असेल तर माती परिक्षण शेतकऱ्याने स्वत: करावे. माती परिक्षणाची जबाबदारी पूर्णत: शेतकऱ्याची राहील. लाभार्थ्याने कलमे / रोपे खरेदी करताना खालील प्रमाणे रोपवाटिकांना प्राधान्य द्यावे.

१३.१ फलोत्पादन विभागाच्या रोपवाटिका

१३.२ कृषि विद्यापिठांच्या रोपवाटिका

१३.३ खाजगी शासन मान्यता प्राप्त (पंजीकृत) रोपवाटिका

१३.४ सामाजिक वनीकरण विभाग किंवा अन्य शासकीय विभाग रोपवाटिका.

१३.५ परवाना धारक खाजगी रोपवाटिके वरुन रोपे /कलमे खरेदी करावयाची गरज पडल्यास आयुक्त कृषिद्वारे लागू केलेल्या दराने ते कलमे/रोपे खरेदी करता येईल.

१३.६ कलमे/रोपे उपलब्धतेबाबतच्या अद्यावत माहितीसाठी National Nursery Portal च्या nnp.nhb.gov.in संकेतस्थळाचा वापर करण्यात यावा.

**१४. रासायनिक खते, रोपे संरक्षण औषधे व इतर साहित्य :-**

या कार्यक्रमासाठी रासायनिक खते, रोपे संरक्षण औषधे व इतर साहित्य शेतकऱ्याने स्वत: खरेदी करुन, खरेदीच्या पावत्या / व्हाऊचर सादर करावे.

**१५. फलोत्पादन विभागाची जबाबदारी :-**

पंचायत व्यतिरिक्त फलोत्पादन व सामाजीक वनीकरण विभागाची सुद्धा कार्यान्वित यंत्रणा म्हणून जबाबदारी राहील.

१५.१ वेळोवेळी कलमे / रोपे / सामुग्री दरांमध्ये वाढ व बदल झाल्यास त्यानुसार सुधारित मापदंड शासन मान्यतेने नवीन दर मंजूर केला जात नाही तोपर्यंत पुर्वीच्या मंजूर मापदंडाप्रमाणे योजनेची अंमलबजावणी करावी.

१५.२. जॉबकार्डवरील नोंदी ठेवणे, बँक/ पोस्ट खात्यांचा तपशिल ठेवणे व हजेरी पत्रके ठेवणे आवश्यक आहे.

१५.३ MIS वर माहिती अपलोड करणे आवश्यक आहे.

१५.४ वेळोवेळी सामाजिक अंकेक्षणासाठी सोशल ऑडीट, हजेरी पत्रक व पावत्या, प्रमाणके, मोजमाप पुस्तक उपलब्ध करणे अनिवार्य आहे.

१५.५ मजूर विस्थापीत करणारी यंत्र सामुग्री वापरण्यास मज्जाव आहे.

१५.६ दिनांक १ मे, १५ ऑगस्ट, २ ऑक्टोबर तसेच अन्य तारखांना होणा-या ग्रामसभेत वार्षिक नियोजनाबाबत लोकांना मार्गदर्शन करणे.

१५.७ कामाच्या ठिकाणचे सर्वेक्षण, कामाची अंदाजपत्रके तयार करणे, तांत्रीक मान्यता देणे, कार्यारंभ आदेशाप्रमाणे कामाचे रेखांकन करणे, काम कार्यान्वित करणे, विहीत कालावधीत मोजमाप करणे, जिओ टॅगींग/ जिओ फेसिंग कामाचा फोटो अपडेट करावेत.

१५.८ या मोजमापाच्या आधारे मजुरांची मजुरी निश्चित करणे.

१५.९ काम पूर्ण झाल्यानंतर कामाचे प्रकल्प पुर्णत्वाचा दाखला देणे.

१५.१० मजूरांची दैनंदिन उपस्थिती नोंदविणे व हजेरीपत्रकात इतर माहिती भरणे. (Job Card No. & Account No.) संबंधित मजूरास अकुशल कामाची मजूरी प्रदान करणे.

१५.११ कामातील कुशल भागावरील सर्व खर्चाची प्रमाणके, मूळहजेरी पत्रक, पावत्या, प्रमाणके, मोजमाप पुस्तिका व इतर अनुषंगिक अभिलेखे लेखा परिक्षणासाठी जतन करणे.

**१६. हजेरी घेण्यासाठी ग्राम रोजगार सहाय्यकाची सेवा घेणे :-**

मनरेगा अंतर्गत मजुरांची हजेरी घेण्यासाठी ग्राम रोजगार सेवकांची सेवा उपलब्ध असते. सर्व विभागांची हजेरी घ्यावयाची जबाबदारी त्यांची राहील.

**१७. लाभार्थ्यांची जबाबदारी :-**

१७.१ महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियम अंतर्गत फळबाग/ फुलपिकांची लागवड करणारे लाभार्थी हे जॉबकार्ड धारक असल्याने स्वत:चे क्षेत्रात केलेल्या फळबाग/ फुलपिकांची लागवडीचे संवर्धन/ जोपासना करण्याची जबाबदारी लाभार्थ्यांची राहिल.

१७.२ वृक्षनिहाय मंजूर मापदंडानुसार दुसऱ्या व तिसऱ्या वर्षातील जिवंत झाडांच्या टक्केवारी प्रमाणे कामे करण्याची जबाबदारी लाभार्थ्यांची राहिल.

१७.३ दुसऱ्या व तिसऱ्या वर्षी बागायती वृक्ष पिकांच्या बाबत जे लाभार्थी कमीत कमी ९० टक्के आणि कोरडवाहू वृक्षपिकांच्या बाबत किमान ७५ टक्के झाडे जिवंत ठेवतील अशाच लाभार्थ्यांना दुसऱ्या व तिसऱ्या वर्षाचे अनुदान देय राहिल.

१७.४ योजनेअंतर्गत शासनाने ठरवून दिलेले खर्च प्रमाणके ही वैयक्तिक भाग घेणाऱ्या लाभार्थ्यास मंजूर केले जाईल व निश्चित केलेला खर्च प्रमाणकापेक्षा जास्त झाल्यास सदर खर्चाची जबाबदारी लाभार्थ्यांनी स्वत: उचलावी.

१७.५ संपूर्ण फळबाग लागवड कार्यक्रमासाठी पूर्व हंगामी मशागत कामे, खड्डे खोदणे, झाडांची लागवड करणे, पाणी देणे, किटकनाशके, औषधे फवारणी व झाडांचे संरक्षण करणे ही कामे स्वत:, नरेगा अंतर्गत तयार श्रमिक गटाद्वारे व जॉबकार्ड धारक मजूरांकडून करुन घेण्याची जबाबदारी लाभार्थ्याची राहील.

१७.६ लाभार्थ्यांच्या ७/१२ उताऱ्यावर लागवड केलेल्या फळपिकाची नोंद घेणे लाभार्थ्यावर बंधनकारक राहील.

१७.७ फळझाड निवडीबाबत लाभार्थ्याची इच्छा व तयारी असावी.

**१८. इतर संकीर्ण बाबी अंतर्गत उपलब्ध अनुदान / खर्च:**

मनरेगा अंतर्गत फळबाग लागवड कार्यक्रमा मध्ये इतर संकिर्ण बाबींखाली साहित्य सामुग्रीसाठी प्रस्तावित करण्यात आलेली तरतूद आकस्मिक खर्चासाठी वापरण्यात यावी. मोजमापन पुस्तिका छपाई, आवश्यक कार्यालयीन खर्चाची देयके उदा. स्टेश्नरी, अंदाजपत्रके तयार करणे, झेरॉक्स, दूरध्वनी, गाडी भाडे, वीज देयके इ., ग्रामरोजगार सेवकाचे मानधन, डाटा एन्ट्री ऑपरेटरचे मानधन, कंत्राटी कर्मचाऱ्याचे मानधन व प्रवास खर्च, प्रसिध्दी, प्रशिक्षण, माती नमूना तपासणी फी, जिल्हाअंतर्गत कलमे / रोपे वाहतूक इत्यादी बाबीं करीता इतर संकिर्ण तरतूदीनुसार प्रशासकिय खर्चातून वित्तीय अधिकारानुसार खर्च करण्यास मान्यता राहील.

यासाठी देय अनुदान ग्रामपंचायत स्तरावर फलोत्पादन विभागाच्या कामगिरीवर अवलंबून राहील. फळबाग व फुलपिक लागवडीसह ग्रामपंचायतीमार्फत करण्यात येणारे इतर कामांमुळे ग्रामपंचायतीमध्ये वर्षातील ७,००० पेक्षा अधिक मनुष्य दिवस निर्माण झाले तरच हे अनुदान लागू होईल. तसेच जेवढ्या ग्रामपंचायती मध्ये ७,००० मनुष्य दिवस ओलांडले जाईल तेवढ्याच ग्रामपंचायतीत फलोत्पादन विभागामार्फत करण्यात आलेल्या कामाच्या ०.५० टक्केच्या मर्यादेत अनुदान अनुज्ञेय राहील.

अशाप्रकारे अनुज्ञेय होणारे अनुदान वर्षाच्या शेवटी आयुक्त मनरेगा द्वारे गणना करण्यात येईल व पुढील वर्षी टप्प्या टप्प्याने फलोत्पादन आयुक्तास release करण्यात येईल. अशा प्रकारे प्राप्त अनुदानाचे न्याय्य पद्धतीने वाटप करण्याची जबाबदारी फलोत्पादन आयुक्तांची राहील. वाटप करताना अधिक कामगिरी बजावणाऱ्या ग्रामपंचायतीत कार्य करणाऱ्या कर्मचाऱ्यांपर्यंत अनुदान पोहोचेल याची खबरदारी फलोत्पादन आयुक्तांनी घ्यावी.

**१९. योजने अंतर्गत समाविष्ट घटकांच्या जबाबदाऱ्या :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत योजनेची अंमलबजावणी फळबाग / फूलपिक लागवड बाबत पंचायत तसेच कृषि व फलोत्पादन विभागाच्या क्षेत्रीय पातळीवरील अधिकारी / कर्मचारी व वृक्ष लागवड बाबत सामाजिक वनीकरण विभागाच्या क्षेत्रीय पातळीवरील अधिकारी / कर्मचारी यांनी करावयाची कामे तसेच जबाबदा-या खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | विषय | संबंधित अधिकारी |
|---|---|---|
| १. | अंदाजपत्रक तयार करणे | कृषि सहाय्यक / तांत्रिक सहाय्यक (पं. स.) / वनक्षेत्रपाल |
| २ | तांत्रिक मंजूरी प्रदान करणे | मंडळ कृषी अधिकारी / कृषी अधिकारी (पं.सं) / सामाजिक वनीकरण विभागाचे सक्षम अधिकारी |
| ३. | प्रशासकीय मान्यता देणे | तालुका कृषी अधिकारी / गट विकास अधिकारी / सामाजिक वनीकरण विभागाचे सक्षम अधिकारी |

**२०. योजना राबविण्यासाठी समिती व त्यांची जबाबदारी :-**

**जिल्हास्तरीय समिती :-**

| अ.क्र. | जिल्हास्तरीय समिती | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद) | सहअध्यक्ष |
| ३. | विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण | सहअध्यक्ष |
| ४. | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ५. | प्रकल्प संचालक, आत्मा | सदस्य |
| ६. | कृषी विकास अधिकारी (जिल्हा परिषद) | सदस्य |
| ७. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य सचिव |

समितीचे कामकाज :-

१. जिल्हा परिषदेच्या स्थायी समितीची मान्यता प्राप्त यादीस या जिल्हास्तरीय समितीची मान्यता आहे असे गृहीत धरून समितीच्या सदस्य सचिव व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी वेळोवेळी यथाशीघ्र संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना कळविणे.

२. योजनेचे संपूर्ण संनियंत्रण करणे.

३. दर तीन महिन्यांनी सभा घेवून योजनेचा आढावा घेणे.

४. जिल्हयातील रोपवाटिकांवरील कलमे/रोपे उपलब्धतेचा आढावा घेवून उपलब्धतेबाबत नियोजन करणे.

५. रोगमुक्त कलमे/रोपे पुरवठा करणेबाबत नियोजन करणे.

६. National Nursery Portal या संकेतस्थळावर नोंद घेणेबाबतची तपासणी करणे.

७. योजनेतील लाभार्थ्यांना शासकिय व कृषि विद्यापीठ रोपवाटिकांवरील कलमे/रोपे परमिटद्वारे मिळणेबाबत नियोजन करणे.

८. लागवड क्षेत्राचे ७/१२ उता-यावर नोंद घेणेबाबत संनियंत्रण करणे.

**राज्यस्तरीय समिती :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत फळबाग / फूलपिक लागवड कार्यक्रमाबाबत समिती खालील प्रमाणे :-

| अ.क्र. | राज्यस्तरीय समिती | |
|---|---|---|
| १ | अ.मु.स./ प्रधान सचिव / सचिव रोजगार हमी योजना | अध्यक्ष |
| २ | आयुक्त (महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रमीण रोजगार हमी योजना) | सहअध्यक्ष |
| ३ | आयुक्त कृषी व फलोत्पादन | सदस्य |
| ४ | प्रकल्प व्यवस्थापक, (MIDH) | सदस्य |
| ५ | फलोत्पादन विभाग प्रमुख महात्मा फुले कृषि विद्यापीठ राहूरी | सदस्य |
| ६ | संचालक, फलोत्पादन | सदस्य सचिव |

सामाजिक वनीकरण अंतर्गत वृक्ष लागवड कार्यक्रमासाठी समिती खालील प्रमाणे :-

| अ.क्र. | राज्यस्तरीय समिती | |
|---|---|---|
| १ | अ.मु.स./ प्रधान सचिव / सचिव रोजगार हमी योजना | अध्यक्ष |
| २ | आयुक्त (महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रमीण रोजगार हमी योजना) | सहअध्यक्ष |
| ३ | प्रधान मुख्य वन संरक्षक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| ४ | विभागीय वन अधिकारी (अर्थसंकल्प नियोजन नागपूर ) | सदस्य |
| ५ | वन संरक्षक सामाजिक वनीकरण, पुणे | सदस्य सचिव |

समितीचे कामकाज :-

१. योजनेचे संपूर्ण संनियंत्रण करणे.
२. जिल्हास्तरीय समितीचा रोपवाटिका तपासणीबाबत आढावा घेणे.
३. रोगमुक्त कलमे/रोपे पुरवठा करणेबाबत नियोजन करणे.
४. National Nursery Portal च्या संकेतस्थळावर नोंद घेणेबाबतची तपासणी करणे.
५. कृषि विद्यापीठाकडील अद्यावत तंत्रज्ञान प्रसार करणे.
६. योजनेतील विहीत तपासणीनुसार संनियंत्रण करणे.
७. लागवड अहवालाबाबत संनियंत्रण करणे.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४७/१४३४ दिनांक २२.१२.२०२१ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौस क्र. २६/२०२२/ व्यय-८ दिनांक २७.०१.२०२२ यांच्या मान्यतेने महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१६१५५१२९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत : सोबत प्रपत्र अ व ब**

Digitally signed by NANDKUMAR VERMA
Date: 2022.03.30 16:17:56 +05'30'

**( नंद कुमार )**
अपर मुख्य सचिव (रोहयो)

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय मुंबई
७. संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय
८. महासंचालक,माहीती व जनसंपर्क मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त,

१०. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर
११. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळून)
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
१३. प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर
१४. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
१८. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी नियोजन विभाग (रोहयो)
१९. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
२०. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२१. निवड नस्ती रोहयो-५.

## प्रपत्र — अ

## योजने अंतर्गत लाभ घेण्याकरिता अर्जाचा नमुना

**प्रति,**

**ग्रामसेवक,**

**ग्रामपंचायत** --------------

**तालुका** ---------------

**जिल्हा** ---------------

**विषय : महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनांतर्गत वैयक्तिक लाभार्थ्याच्या सलग शेतावर, शेताच्या बांधावर व पडीक जमिनीवर अमृत महोत्सवी फळझाड/ वृक्ष लागवड व फूलपिक लागवड योजनेचा लाभ घेण्याबाबत...**

**संदर्भ : शासन निर्णय, नियोजन विभाग (रोजगार हमी योजना कक्ष) क्र. फळबाग-२०२१/ प्र.क्र.६३/ मग्रारो-०५ दिनांक -........................**

मी माझ्या स्वत:च्या मालकीच्या जमीनीत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत संदर्भाधीन शासन निर्णयानुसार **फळबाग /फुलपिके /वृक्ष लागवड** करु इच्छित आहे. मी धारण केलेल्या जमीनीसंबंधी माहिती खालीलप्रमाणे आहे.

१. शेतकऱ्याचे नाव ---------------------------------------

२. गाव ---------------- तालुका ------------------ जिल्हा -----------------

३. जॉबकार्ड क्रमांक -------------

४. लाभार्थ्यांची वर्गवारी (अनु. जाती / अनु. जमाती / भटक्या जमाती / निरधिसूचित जमाती (विमुक्त जमाती) / दारिद्र्य रेषेखालील इतर कुटूंबे / स्त्री कुटूंबप्रमुख असलेली कुटूंबे / जमीन सूधारणांचे लाभार्थी / प्रधानमंत्री आवास योजना — ग्रामीण योजनेखालील लाभार्थी / अनुसुचित जमातीचे व इतर पारंपरिक वनवासी (वन हक्के मान्य करणे) अधिनियम, २००६ (२००७ चा २) खालील पात्र लाभार्थी/ इतर. (योग्य वर्गवारीत ✔ खूण करावे).

५. लाभार्थ्याच्या नावे जमीन- ८-अ प्रमाणे एकूण क्षेत्र: ------------------ हे. लागवडीचा भूमापन क्रमांक ------------------ व त्याचे क्षेत्र -------------- हे.

६. संयुक्त खातेदार असल्यास अर्जदाराच्या हिश्याचे प्रमाणानुसार क्र. ४ नुसार लागवड करावयाच्या जमिनीचे भूमापन क्रमांक -------------- व त्याचे क्षेत्र -------------- हे.

७ रोजगार हमी व्यतिरीक्त इतर शासकिय योजने अंतर्गत पुर्वी फळबाग /फुलपिके /वृक्ष केली असल्यास

तपशिल

| अ. क्र. | गट क्रमांक | गटाचे क्षेत्र (हे.) | लागवड क्षेत्र (हे.) | लावलेल्या झाडांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |

७. जमीनीचा प्रकार (हलकी/ मध्यम/ भारी/ कातळ/ पडीक) (योग्य बाबींवर ✔ खूणा करा.)

८. माझ्या शेतावर फळबाग /फुलपिके /वृक्ष लागवड

अ. पंचायत/

ब. कृषी व फलोत्पादन

विभागामार्फत करण्यात यावे. (वरील 'अ' आणि 'ब' पैकी एकावर ✔ खूण करा.)

९. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत **फळबाग /फुलपिके /वृक्ष लागवड** कार्यक्रमाखाली लागवडीसाठी वापरावयाच्या प्रजाती (२/३ प्रकारची पिके लागवड करण्यास मुभा राहील. मात्र work code एकच तयार होईल.)

एकूण क्षेत्र (हे.) -------------------

१. प्रजातीचा तपशील क्षेत्र --------- हे रोपांची संख्या -------------

२. प्रजातीचा तपशील क्षेत्र --------- हे रोपांची संख्या -------------

३. प्रजातीचा तपशील क्षेत्र --------- हे रोपांची संख्या -------------

१०. उपलब्ध असल्यास ओलिताचे साधन

(विहीर, लिफ्ट, कॅनॉल, नदी) (योग्य बाबींवर ✔ खूण करा.)

११. बँक खात्याचा तपशिल – (बँक पासबुक मध्ये खाता क्रमांक व IFSC CODE असलेल्या पान तसेच शेवटचा transaction चा/ चेक बुक असल्यास त्याचे ही, Soft copy/ Scan copy जोडणे आवश्यक)

बँकेचे नाव --------------------------------- खाते क्रमांक -------------------------

शाखा -------------------------------- IFSC CODE ------------------------

शासनाने विहीत केलेल्या नियम व अटीप्रमाणे वर नमूद केलेल्या झाडांची लागवड करेल. तसेच मी स्वत: / माझे कुंटूबातील कार्यक्षम व्यक्ती या महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतील प्रमाणित मजूर म्हणून घोषित करेल. रोपे लागवड केल्यानंतर त्यांची सुयोग्य जोपासना व संरक्षण करेल. तेव्हा मला सदर योजनेत सहभागी करुन घ्यावे, ही विनंती. सोबत ७/१२ उतारा व ८-अ जोडला आहे.

आपला विश्वासू

स्थळ : (शेतकऱ्याचे नाव व सही / अंगठा)

दिनांक :

## प्रपत्र - ब

## संमतीपत्र

**वरील प्रपत्र 'अ' प्रमाणे महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेशी निगडीत फळबाग /फुलपिके /वृक्ष लागवड योजनेअंतर्गत मी अर्ज केला आहे. त्यास मंजूरी मिळाल्यास त्याकरीता माझ्या / आमच्या मालकीच्या/ जमीनीवर ही योजना राबविण्यास संमती देत आहे / आहोत.**

१. सदरची योजना राबविण्याकरीता मी स्वत: / माझे कुटुंबातील कार्यक्षम व्यक्ती महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतील प्रमाणित मजूर म्हणून घोषित करीत आहे / आहोत. या योजनेकरीता होणारी सर्व कामे प्रामुख्याने पूर्ण करण्याची जबाबदारी माझी किंवा जॉबकार्ड धारक मजूरांकडून करुन घेण्याची जाबाबदारी माझी/ आमची राहील.

२. योजनेअंतर्गत आवश्यक कलमे/ रोपांची वाहतूक मला स्वत: करावी लागेल याची मला कल्पना देण्यात आलेली असून मला ते मान्य आहे.

३. झाडांची लागवड केल्यानंतर हप्ता रक्कम मिळण्यासाठीचे पात्रता निकष मला अवगत करुन देण्यात आलेले असून ते मला मान्य राहतील.

४. या योजनेचे नियम व अटी मला बंधनकारक आहे व त्यानुसार मी कलमा/ रोपांची लागवड / संगोपन/ संरक्षण करीन.

५. सदर योजनेअंतर्गत एकूण क्षेत्राप्रमाणे व नमुन्याप्रमाणे शासनाने प्रतिवर्षी मंजूर केलेल्या मर्यादेच्या प्रमाणकापेक्षा जास्त खर्च झाल्यास तो खर्च मी / आम्ही स्वत: करील.

६. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेशी निगडीत फळबाग /फुलपिके /वृक्ष लागवड योजनेची माहिती मला/ आम्हाला मान्य असल्याचे कबूल करुन त्या प्रमाणे करारपत्रावर सहया केल्या आहेत.

७. या योजनेअंतर्गत शासन वेळोवळी जे बदल करेल अथवा अटी घालेल त्या अटी / बदल मला / आम्हाला मान्य राहतील.

८. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत **फळबाग /फुलपिके /वृक्ष लागवड** योजनेमध्ये समाविष्ट करून /घेण्याकरीता मी /आम्ही दिलेला तपशील ७/१२ चे उताऱ्याप्रमाणे बरोबर आहे.

९. मी/ आम्ही संयुक्त खातेदार असून माझ्या/ आमच्या हिश्याच्या भूमापन क्र. ……………… मध्ये हेक्टर क्षेत्रावर **फळबाग /फुलपिके /वृक्ष लागवड** करण्यास परवानगी दिल्यास वरील सर्व अटी मला/ आम्हाला मान्य राहतील .

ठिकाण- सही /अंगठा

दिनांक - ( लाभार्थ्याचे नाव)

साक्षीदार-

१.

२.